नगरोत्थान महाभियानांतर्गत त्र्यंबक शहराच्या मलनि:स्सारण प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- नगरो-२०२५/प्र.क्र.५१/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- १५ एप्रिल, २०२५

**संदर्भ:-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: नगरो-२०१६/प्र.क्र.३२८/नवि-३३, दिनांक ०४ ऑक्टोबर, २०१६.

२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३, दिनांक १४ फेब्रुवारी,२०१७.

३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र: ग्रापाधो-२०२१/प्र.क्र.१२२/पापु-०७, दिनांक २९ जून,२०२२.

४. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: नगरो-२०२३/प्र.क्र.२१३/नवि-३३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.

५. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: नगरो २०२३/प्र.क्र.३८९/नवि-३३, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२४.

६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: नगरो २०२४/प्र.क्र.२०१/नवि-३३, दिनांक १३ मार्च, २०२४.

७. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: नगरो २०२४/प्र.क्र.२३३/नवि-३३, दिनांक २८ मार्च, २०२४.

८. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: शिकाना- २०१९/प्र.क्र.०३/नवि-३३, दिनांक २८ जून, २०२१.

९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक यांचे पत्र क्र: जा.क्र./मुअ/नाशिक/चिशा/ २२१३/२०२४, दिनांक २२ ऑगस्ट, २०२४.

१०.नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र.नपप्रसं/नगरोत्थान/त्र्यंबक UGD-I /का.७/ २०२४/६१३९, दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२४.

११.नगरोत्थान महाभियानांतर्गत प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या दिनांक ३१ जानेवारी, २०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

**०२.** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत **त्र्यंबक नगरपरिषदेचा** मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्पास संदर्भ क्रमांक ८ अन्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आली होती. सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने

राष्ट्रीय हरित लवादाचे आदेश व सदर प्रकल्पास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक विभाग यांनी दिलेल्या सुधारीत तांत्रिक मान्यतेस अनुसरून संदर्भाधीन क्रमांक ८ अन्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सुधारित करुन संदर्भाधीन क्रमांक ९ अन्वये देण्यात आलेल्या सुधारीत तांत्रिक मान्यतेनुसार प्रशासकीय मान्यता सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

०१. नगरोत्थान महाभियानांतर्गत **त्र्यंबक नगरपरिषदेच्या मलनिस्सारण (टप्पा-१) प्रकल्पास** संदर्भाधीन क्रमांक ८ अन्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सुधारीत करुन संदर्भाधीन क्रमांक ९ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिलेल्या सुधारीत तांत्रिक मान्यतेनुसार व संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतूदीच्या व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे. :-

| Sr. No. | Sub Work | Amount in (Rs.) |
|---|---|---|
| 1 | Conveyance of Waste Water (Branch Sewers) | |
| | a) Branch Sewer Network (Phase-1= 600-300 RCC NP - 3, L= 4.10 km, 150-250 HDPE DWC L = 25.79 km. Total L = 29.89 km. Phase - II = 150-170 HDPE DWCL = 10.91 km. Total L= 10.91 km. Total Network = 40.80 km | 178390033 |
| | b) Nalla Interception Provision -2 Nos | 886789 |
| 2 | Design and Constructions of Pumping Stations | |
| | a)Receiving Chamber @ Pumping Station | 1074694 |
| | b)Pumping Station (RCC 6.0 m Dia D-10.6 m) | 14662524 |
| 3 | Electrical & Mechanical Works | |
| | a) Pumping Machinery at Pumping Station (1/2 DWF = 15 HP(1+1), 1 DWF = 30HP(1+1), 2 DWF = 55HP(1 Nos) | 6551423 |
| 4 | Constructions of Rising Mains | |
| | a) Rising Main 400 mm Dia. K9 Class Pipe (PS to STP L-100m) | 1345694 |
| 5 | Sewerage Treatment Plant | |
| | a) Sewerage Treatment Plant 4.50 MLD (MMBR) | 60297361 |
| 6 | Treated Water Sump and Disposal Arrangements | 2590905 |
| 7 | Protection Wall | |
| | a) Protection Wall for STP @ Godavri River Ch 00 to 182m | 22777537 |
| 8 | RCC Bridge | |
| | a) RCC Bridge @ Godavri River L-22m | 11007133 |
| 9 | Miscellaneous Works | |
| | a) Construction of W.B.M. Road, Retaining Wall, Staff Quarters @ PS & STP & Sewer Jetting Machine for Cleaning of Sewers etc. | 7648191 |
| 10 | Road Reinstating Work | 15615876 |
| 11 | Trial Run ( Running the scheme on Trial Basis | 5863685 |
| 12 | Solar Power Plant (101 KW) | 3272763 |
| | Total | 331984607 |
| | 18% GST | 59757229 |
| | PMC Charges | 6938478 |
| | Gross Total | 398680315 |
| | **Say Rs.** | **39.87 Cr.** |
| प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी कार्यादेश दिनांकापासून १८ महीने | | |

०२. **<u>त्र्यंबक नगरपरिषदेच्या</u> <u>मलनिःस्सारण</u> <u>प्रकल्पाचा</u>** वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (वाढीव प्रकल्प किंमतीच्या ९५ %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (वाढीव प्रकल्प किंमतीच्या ०५ %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | त्र्यंबक नगरपरिषद | रु. ३९.८७ कोटी (रु.५.८७* कोटी) | रु. ३६.१८ कोटी (रु. ३०.६०**+ ५.५८*** कोटी) | रु. ३.६९**** कोटी (रु. ३.४०**+०.२९*** कोटी) |

* मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक विभाग यांच्या दिनांक २२ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या सुधारित तांत्रिक मान्यतेनुसार वाढीव प्रकल्प किंमत.

**दिनांक २८ जून, २०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार मंजूर वित्तीय आकृतीबंधानुसार अनुज्ञेय हिस्सा.

***वाढीव प्रकल्प किंमतीसाठी या अभियानाच्या दिनांक २२ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयानुसार मंजूर वित्तीय आकृतीबंधानुसार अनुज्ञेय हिस्सा.

****या प्रकल्पासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा आदिवासी विकास उपयोजनेतून अनुज्ञेय राहील.

०३. संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयानुसार **<u>त्र्यंबक नगरपरिषदच्या मलनिःस्सारण</u>** प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

**अ) प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा** :-

१. सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन **त्र्यंबक नगरपरिषदमार्फत** करण्यात यावे.

२. सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

३. या प्रकरणातील मा. राष्ट्रीय हरित लवादाचे आदेश विचारात घेता सदर प्रकल्पाचे काम विहित कालमर्यादेत पूर्ण करण्याच्या जबाबदारीसह सदर प्रकल्पासाठी संदर्भाधीन क्रमांक ८ मधील शासन निर्णयानुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार कायम राहतील. त्यानुसार प्रकल्पाची कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांनी मा. राष्ट्रीय हरित लवादाचे आदेश विचारात घेता सदर प्रकल्पाचे काम विहित कालावधीत पूर्ण करून घ्यावे.

४. या अभियानाच्या संदर्भाधीन क्रमांक ५ मधील शासन निर्णयातील कार्यपद्धतीचे पालन करावे.

**ब) सुधारणांची पूर्तता :-** नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खालीलप्रमाणे सुधारणा राबविणे आवश्यक राहिल.

१. विभागाने विकसित केलेल्या महायुलबी प्रणालीचा अंगीकार करुन अथवा सदर प्रणालीशी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सध्या वापरात असलेल्या संगणकीय प्रणालीचे एकात्मिकिकरण (Integration) करुन त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारण्याची १०० % अंमलबजावणी करणे इ. बाबी बंधनकारक राहतील.

२. उचित वापरकर्ता शुल्क लागू करुन किमान एकूण मागणीच्या ८० % वसुली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. त्र्यंबक नगरपरिषदेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील घन व ओल्या कचऱ्याचे व्यवस्थापन उचितरित्या करणे बंधनकारक राहील.

५. त्र्यंबक नगरपरिषदेने कार्यक्षेत्रातील सर्व इमारतीसाठी पर्जन्य जल पुनर्भरण करावे.

**क) निधी वितरणाची कार्यपद्धती:-**

१. नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी संदर्भाधीन क्रमांक ५ मधील निधी वितरणाच्या कार्यपद्धतीनुसार निधी वितरित करण्यात येईल. तसेच, त्र्यंबक नगरपरिषदेच्या स्वहिश्याची रक्कम शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकामध्ये स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

२. सदर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना त्र्यंबक नगरपरिषदेने त्यांना राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या १४ व्या वित्त आयोग (मुलभूत व कार्यात्मक) अनुदानाशी तसेच प्राप्त होणाऱ्या १५ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाशी सांगड (Convergence) घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी यामधून मिळणारा निधी चिन्हांकीत करुन ठेवणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

३. शासनाने वितरीत केलेल्या हप्त्याची रक्कम व त्या प्रमाणात त्र्यंबक नगरपरिषदेच्या हिश्याची रक्कम अशा एकूण रकमेच्या ७५ % खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्र्यंबक नगरपरिषदेने नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतर पुढील हप्त्याच्या निधी वितरीत करण्यात येईल.

४. त्र्यंबक नगरपरिषदेने दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्याचा निधी मागणी प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सदर प्रस्तावाची छाननी करुन उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव द्यावा.

५. सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाने त्र्यंबक नगरपरिषदेस राज्य शासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्य शासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल त्याप्रमाणात त्र्यंबक नगरपरिषदेने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे या योजनेत त्र्यंबक नगरपरिषदेचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.

६. सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व तो अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी त्र्यंबक नगरपरिषद व संबंधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

**ड) निविदा प्रक्रिया, कार्यादेश व कार्यान्वयन :-**

१. त्र्यंबक नगरपरिषदेच्या सदर मलनि:स्सारण प्रकल्पाच्या मुळ प्रशासकीय मान्यते व्यतिरिक्त नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या उपांगांची स्वतंत्र निविदा विहित कार्यपद्धतीनुसार राबविण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, त्र्यंबक नगरपरिषद व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांची राहील.

२. नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक ६ मधील शासन परिपत्रकानुसार निविदा प्रक्रियेबाबत कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

३. अमृत २.० अभियानांतर्गत पाणीपुरवठा व मलनि:स्सारण प्रकल्पांसाठी संदर्भाधीन दिनांक १३ मार्च, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदर्श निविदा पुस्तिका (Model DTP) प्रसिध्द केली असून त्यानुसार अथवा त्यात वेळोवेळी केल्या जाणाऱ्या सुधारणानुसार नगरोत्थान महाभियानांतर्गत देखील निविदा प्रक्रिया राबविणे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस बंधनकारक राहील व अन्य प्रकारच्या प्रकल्पांसाठी

शासनाच्या व केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार निविदा प्रक्रिया राबविणे बंधनकारक राहील.

४. यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.

५. त्र्यंबक मलनि:स्सारण प्रकल्प पूर्ण करताना राज्य शासनाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील. या प्रकल्पातील रस्ते पाणीपुरवठा/मलनि:स्सारण अशा कामांसाठी पुन्हा खोदावे लागणार नाहीत अशा पध्दतीने या रस्त्यांच्या कामांचे नियोजन करण्यात यावे. तसेच, सदर प्रकल्पात नमूद कामे मागील ५ वर्षात इतर कुठल्याही योजनेमधून करण्यात आलेली नाहीत याची पुनश्च खातरजमा करण्याची जबाबदारी मुख्याधिकारी, त्र्यंबक नगरपरिषद यांची राहील.

६. सदर प्रकल्पासाठी विहित केलेल्या कार्यमर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

७. सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश दिल्यानंतर प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या वस्तूंची खरेदी ही प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराच्या मार्गदर्शनाने करावी.

८. सदर प्रकल्पासाठी सुरुवातीला अनावश्यक स्वरुपात **कोणत्याही प्रकारच्या वस्तूंची खरेदी करणे व त्यासाठी प्रकल्प निधीतून प्रदान करणे ही गंभीर स्वरुपाची वित्तिय अनियमितता** समजण्यात येईल व त्यासाठी **संबंधित कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यंत्रणेस जबाबदार** धरण्यात येईल.

९. सदर प्रकल्पासाठी स्वहिश्याची आवश्यक तरतूद, आवश्यक परवानग्या घेतल्याची व प्रकल्पातील सर्व उपांगाच्या जागा नगरपरिषदेच्या नावावर व ताब्यात असल्याची आणि आवश्यक तांत्रिक बाबींची पूर्तता झाल्याची खातरजमा मुख्याधिकारी, त्र्यंबक नगरपरिषद व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यांनी करावी.

**इ) <u>प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण :-</u>**

- नगरोत्थान महाभियानातंर्गत मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासनाने विहीत केलेल्या यंत्रणेंपैकी एका यंत्रणेकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करुन घेणे बंधनकारक राहिल. तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**फ) <u>प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी :-</u>**

१. नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयकृत बँकांकडून" तसेच "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" (एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल) व शासन मान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.

२. तथापि, वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात येईल. तसेच शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहिल.

**ग) <u>प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती :-</u>**

१. नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत करण्यात यावे, जेणेकरुन सदर प्रकल्पांतून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वत राहील.

२. सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

३. प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे मलनि:स्सारण कराची आकारणी करणेबाबत सर्वसाधारण सभेची मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणे नगरपरिषदेवर बंधनकारक राहील.

**ह) <u>इतर बंधनकारक अटी व शर्ती :-</u>**

१. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित **<u>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची</u>** राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

२. संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

३. तसेच, सदर प्रकल्पास संदर्भाधीन क्रमांक ८ मधील शासन निर्णयातील उर्वरित अटी व शर्ती या कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२५०४१५१७१७०८७२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SACHIN DATTATRAY SAHASRABUDDHE
Date: 2025.04.15 17:18:23 +05'30'

**( सचिन द. सहस्त्रबुद्धे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२), मंत्रालय, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
११. विभागीय आयुक्त, नाशिक.
१२. जिल्हाधिकारी, नाशिक.
१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक विभाग.
१४. जिल्हा प्रशासन अधिकारी, नाशिक.
१५. मुख्याधिकारी, त्र्यंबक नगरपरिषद, त्र्यंबक.
१६. निवड नस्ती, नवि-३३.